**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत कार्यरत असलेल्या श्रीम.राजश्री राजेंद्र बोकरे, लघुटंकलेखक यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.९८/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०८ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी -२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी -२०२०/प्र.क्र.१८७अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.२४ जानेवारी,२०२२, दि.२३ फेंब्रुवारी, २०२३, दि.१३ डिसेंबर, २०२३.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी -२०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे क्र.मुअ(कों)/आस्थापना-४/२२६९, दि.०६ जून, २०२४ रोजीचे पत्रे.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या श्रीम.राजश्री राजेंद्र बोकरे, लघुटंकलेखक यांचे अनुसुचित जमातीचे जातीदावे अवैध ठरल्यामुळे त्यांच्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२४ जानेवारी, २०२२ अन्वये अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना ११ महिने किंवा त्या सेवेत राहिल्या असत्या तर त्या ज्या दिनांकाला सेवानिवृत्त होतील त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशींवर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

तद्नंतर श्रीम.राजश्री बोकरे यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. १४ डिसेंबर, २०२२ मधील अनु क्र. २ नुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय,२३ फेब्रुवारी, २०२३ व १३ डिसेंबर, २०२३ अन्वये अनुक्रमे (दि.२८ सप्टेबर, २०२२ ते दि. २७ ऑगस्ट, २०२३ पर्यंत) व पुढे (दि. २९ ऑगस्ट, २०२३ पासून दि. २८ जुलै, २०२४ पर्यंत) ११ महिने मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदर पदाची मुदत संपुष्टात आल्यामुळे श्रीम. बोकरे यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या श्रीम.राजश्री राजेंद्र बोकरे, लघुटंकलेखक यांचे अनुसुचित जमातीचे जातीदावे अवैध ठरल्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२४ जानेवारी, २०२२ अन्वये त्यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ मधील अनु क्र.२ नुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन ११ महिने (दि.३० जुलै, २०२४ पासून ते दि.२९ जून, २०२५ पर्यंत) किंवा त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीम.राजश्री राजेंद्र बोकरे | लघुटंकलेखक | ११ एप्रिल, १९९७ | ३० नोव्हेंबर, २०३१ |

२. श्रीम.राजश्री बोकरे यांच्या अधिसंख्य पदावरील वेतनावर होणारा खर्च हा श्रीम.बोकरे ज्या कार्यालयात कार्यरत राहतील, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधीत वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९, दि.३० जून, २०२० व दि.१४ डिसेंबर, २०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८०८१६२१४९१२१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDEEP SAHADEO REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.08.08 16:37:04 +05'30'

**( सुदिप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण.
२) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३) महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४) प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवडनस्ती.